**महाराष्ट्र राज्यातील ५० गुणवत्ताधारक मुलींना IIT / JEE आणि इंटरनॅशनल ऑलिम्पीयाड इ. स्पर्धात्मक परीक्षांच्या पूर्वतयारीसाठी IITians PACE या संस्थेमार्फत मोफत प्रशिक्षण देण्याकरिता निधी उपलब्ध करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक संकीर्ण-२०१६/प्र.क्र.१९५/का-०३**
नवीन प्रशासन भवन, तिसरा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक- १९ जून, २०१७

**वाचा :-** १) शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग क्रमांक- संकीर्ण-२०११/प्र.क्र.२१३/ का-०३, दि. ०९.०७.२०१३.
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३,दि.१८.०४.२०१७.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्यातील ५० गुणवत्ताधारक मुलींना IIT /JEE आणि इंटरनॅशनल ऑलिम्पीयाड इ. स्पर्धात्मक परीक्षांच्या पूर्वतयारीसाठी IITians PACE या संस्थेमार्फत मोफत प्रशिक्षण देण्याबाबतच्या खर्चास शासन निर्णय क्रमांक- संकीर्ण-२०११/प्र.क्र.२१३/का-०३, दिनांक ०९ जुलै, २०१३ अन्वये मान्यता देण्यात आली आहे. सदर प्रशिक्षण देण्याबाबत आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे आणि IITians PACE, अंधेरी, मुंबई यांच्यामध्ये करार झाला आहे.

शासन परिपत्रक, वित्त विभाग, दिनांक १८.०४.२०१७ नुसार सन २०१७-१८ च्या प्रथम नऊमाहिकरीता अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या निधीच्या ८० टक्केच्या मर्यादेत निधी वितरणासाठी उपलब्ध करण्यात आला आहे. सन २०१७-१८ साठी २२३५-बी १९२ या लेखाशिर्षाखाली ८० टक्के मर्यादेतील तरतूद आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांना वितरित करणेबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. सबब शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र राज्यातील ५० गुणवत्ताधारक मुलींना IIT /JEE आणि इंटरनॅशनल ऑलिम्पीयाड इ. स्पर्धात्मक परीक्षांच्या पूर्वतयारीसाठी IITians PACE या संस्थेमार्फत मोफत प्रशिक्षण देणेबाबत या योजने अंतर्गत उपलब्ध करुन द्यावयाच्या निधीमधून २२३५-बी १९२ या लेखाशिर्षाखाली ८० टक्के मर्यादेतील तरतूद ₹६३,९२,०००/- (अक्षरी रुपये त्रेसष्ट लक्ष ब्याण्णव हजार फक्त) इतका निधी आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांना वितरित करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. याकरीता आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर निधी खर्च करताना विहित नियमावली व या विभागाच्या तसेच वित्त विभागाच्या वेळोवेळी निर्गमित केलेल्या सूचनांचे तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन परिपत्रकातील सर्व अटी व शर्तींचे पालन करण्यात यावे. हा निधी IITians PACE, अंधेरी, मुंबई यांना वितरित करावा. तसेच सदर निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

३. हा खर्च मागणी क्रमांक एक्स-१, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२, समाजकल्याण, १०२, बाल कल्याण, (१३) (०१) आयआयटी पेस अकॅडमी सारख्या संस्थांच्या सहकार्याने स्पर्धात्मक परीक्षांसाठी ५० मुलींकरीता मोफत शिकवणीची तरतूद करणे (२२३५ बी १९२) ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली सन २०१७-१८ या वित्तीय वर्षाकरिता मंजूर असलेल्या तरतुदीतुन भागविण्यात यावा. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३, दि.१८ एप्रिल, २०१७ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०१७०६१९१५१७५६१०३० असा आहे. सदरचा निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Smita Dattatray Nivatkar

Digitally signed by Smita Dattatray Nivatkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Women And Child Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3fa46cf1e928518ffc98619187a1ef6de2dd57c16934e9cb6672cc02aa258b08, cn=Smita Dattatray Nivatkar
Date: 2017.06.20 15:50:59 +05'30'

**( स्मिता निवतकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. महालेखापाल- महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर.
३. महालेखापाल- महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा), मुंबई / नागपूर.
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
६. जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, मुंबई उपनगर.
७. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. कक्ष अधिकारी (का-४), महिला व बाल विकास विभाग.
१०.निवड नस्ती, का-३.

******